प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत रस्त बांधकामासाठी FDR (Full Depth Reclamation) पद्धतीची अंमलबजावणी करण्याकरीता व्यावसायिक प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU)/ प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) नेमण्याबात....

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मुग्रायो-२०२४/प्र.क्र.२१/बांधकाम-४**
बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक : १५ मार्च, २०२४.

**वाचा:**

१) **संचालक (आर.सी.) भारत सरकार, ग्राम विकास मंत्रालय, कृषिभवन, नवी दिल्ली, पत्र क्र:** पी-१७०२४/१५/२०२०-आरसी (एम.एफ.एस. क्र.३७१९१७) दिनांक १२ जानेवारी, २०२३.

२) **शासननिर्णय, ग्राम विकास विभाग पत्र क्रमांक :** प्रमंग्रासयो-२०२३/प्र.क्र.२१९/बांध-२, दि. २६ जून, २०२३.

३) **मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांक :** मु.अ./प्रमंग्रासयो/०४/२०२४, व ८४/२०२४, दिनांक ०२/०१/२०२४ व ०८/०१/२०२४

**प्रस्तावना:**

संचालक (आर.सी.) भारत सरकार, ग्राम विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी उपरोक्त वाचा येथील संदर्भीय पत्र क्र. १ अन्वये प्रधानमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-३, बॅच १ सन २०२२-२३ अंतर्गत २०३९.८६ कोटी रक्कमेच्या २५५१.६३ कि.मी. लांबीच्या ४१२ रस्ते कामांना मान्यता प्रदान केली आहे. सदर कामामध्ये १७१.६३ कि.मी. लांबी ही FDR (Full Depth Reclamation) पद्धत अंतर्गत मंजूर आहे. तसेच मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा २ अंतर्गत मंजूर कामामध्ये देखील १०० कि.मी. लांबीसाठी FDR (Full Depth Reclamation) पद्धतीचा समावेश करण्यात आला आहे. केंद्र शासनाने सदर कामे मंजूर करतेवेळी FDR (Full Depth Reclamation) तंत्रज्ञानाचा वापर करतांना दैनंदिन देखरेख, व्यवस्थापन व गुणवत्ता नियंत्रणासाठी व्यावसायिक प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU)/ प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची (PMC) नेमणुक करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. त्यानुषंगाने प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत FDR (Full Depth Reclamation) तंत्रज्ञानाचा समावेश असलेल्या कामासाठी व्यावसायिक प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU)/ प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार (PMC) नेमण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उक्त परिच्छेदामध्ये नमुद केल्यानुसार केंद्रशासनाच्या सूचनेनुसार प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत मंजूर असलेल्या व रस्ते बांधकामासाठी FDR (Full Depth Reclamation) तंत्रज्ञानाचा समावेश असलेल्या कामासाठी व्यावसायिक प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU)/ प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची (PMC) नेमणुक करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या अंदाजपत्रकास खाली दर्शविलेल्या किंमतीस व अटीस अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | लांबी (कि.मी.) | कामाची अंदाजीत रक्कम (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| ०१ | प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत रस्त बांधकामासाठी FDR (Full Depth Reclamation) पद्धतीची अंमलबजावणी करण्याकरीता व्यावसायिक प्रकल्प व्यवस्थापन घटक (PMU)/ प्रकल्प व्यवस्थापन सल्लागाराची (PMC) नेमणूक करणे.<br>अ) प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत कामे<br>ब) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत कामे | <br><br><br><br><br>१५०.००<br>१००.०० | <br><br><br><br><br>३४५.६९<br>२३०.४५ |
| | **एकुण** | **२५०.००** | **५७६.१४** |

१. सदरचे काम ग्राम विकास विभागाच्या अधिनस्त असलेल्या महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेमार्फत, प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर व ग्राम विकास विभागाच्या अटी व शर्तीवर कार्यान्वीत करण्यात यावीत.

२. मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), पुणे, संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) व संबंधित कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी शासन निर्णय ग्राम विकास विभाग क्रमांक ग्रासयो-२०१८/प्र.क्र.२३९/बांधकाम-१, दि.२५.१०.२०१८ अन्वये तसेच शासन पत्र क्रमांक मुग्रायो-२०१९ / प्र क्र. ७३/ बांध -४ दिनांक २२ जानेवारी,२०१९ अन्वये दिलेल्या अधिकारानुसार तांत्रिक मान्यता द्यावी.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था व मुख्य अभियंता तसेच संबंधित अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.) यांनी प्रस्तुत कामासाठी ई-टेंडरिंग करुनच कार्यारंभ आदेश देण्यात यावेत.

४. सदर कामासाठी सल्लागाराचे देकार स्वीकारताना शुल्काची रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दिनांक २५ जानेवारी, २०१९ रोजीच्या निर्णयाद्वारे निश्चित केलेल्या अधिकतम

दराच्या मर्यादेत राहील याची सक्षम अधिकारी यांनी दक्षता घ्यावी व सल्लागार नेमण्याच्या निविदेस शासनाची मान्यता घेणे अनिवार्य राहील.

**०२.** सदर कामावरील खर्च अ) प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेसाठी मागणी क्र. एल-७, ५०५४, मार्ग व पूल, ०४ जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३८, प्रधानमंत्री ग्रामसडक योजना (००) (०२) प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत नविन रस्ते व पुल बांधणे तसेच अस्तित्वातील रस्त्यांची दर्जोन्नती करणे याकरीता अनुदाने (केंद्र हिस्सा)- ५०५४ ५०२४, ५३-मोठी बांधकामे व राज्य हिस्सा करीता (००) (०३) प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत नविन रस्ते व पुल बांधणे तसेच अस्तित्वातील रस्त्यांची दर्जोन्नती करणे याकरीता अनुदाने (राज्य हिस्सा)- ५०५४ ५२३३, ५३-मोठी बांधकामे, ब) मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी मागणी क्रमांक एल-७, ५०५४, मार्ग व पूल यावरील भांडवली खर्च ०४, जिल्हा व इतर ग्रामीण मार्ग ३३७, रस्त्यांची बांधकामे (०१०१) मोठी बांधकामे सीआरसी- ५०५४ ५१५३, या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१५२०४२१३२०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.03.15 23:17:34 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. विधानसभा /विधानपरिषद सदस्य.विधानमंडळ, मुंबई.
२) मा. मंत्री (ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई.
३) संचालक (आर.सी.) ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली.
४) प्र.स. (ग्रा.वि. व पं.रा.), बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
५) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) वित्तीय नियंत्रक (प.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
८) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
९) कार्यकारी अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.

१०) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
११) कक्ष अधिकारी, (बांधकाम-२), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.